**औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांच्या आस्थापनेवर महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत “सहायक संचालक, गट-ब” या पदावर प्रतिक्षायादीतून नामनिर्देशित उमेदवारांना शासन सेवेत तात्पुरती नियुक्तीसह पदस्थापना देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन आदेश क्रमांक : औसुवआ ०७२४/प्र.क्र.११०/काम.१**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- ३ मार्च, २०२५**

**संदर्भ :**- १) उप सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, नवी मुंबई यांचे पत्र क्र.आयएलआर २१२१/प्र.क्र.१०३/२०२३/अठ्ठावीस, दि.१५/०७/२०२४, दि.७.८.२०२४ व दि.२०.९.२०२४.

२) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्रमांक एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१.

३) सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्रमांक एसआरव्ही २०१६/प्र.क्र.२८१/बारा, दि.२१.०६.२०२१.

४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक परिवी २७१५/प्र.क्र.३०२/कार्या-८, दि.२२.०६.२०२१

५) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२२/प्र.क्र.१६७/१६-अ, दि.२१.११.२०२२

६) उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभागाचा शासन आदेश क्र.औसुवआ ०९२३/प्र.क्र.१६०/काम.१, दि.१२.१०.२०२३

७) संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय,मुंबई यांचे पत्र क्र.औसुवआ/ आस्थापना/गोप-६/२,दि.१७.१.२०२५.

८) प्रधान सचिव (कामगार) यांचे अध्यक्षखाली दि.१०.०२.२०२५ रोजी पार पडलेल्या नागरी सेवा मंडळ बैठक इतिवृत्त.

**प्रस्तावना:-**

औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाच्या आस्थापनेवरील महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत “सहायक संचालक, गट-ब” या पदांवरील नियुक्तीसाठी (जाहिरात क्र. ०१९/२२) सरळसेवा भरतीद्वारे घेण्यात आलेल्या महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांच्या क्रमांक:-आयएलआर-२१२१/प्र.क्र.१०३/२०२३/अठ्ठावीस, दि.०७.०९.२०२३ च्या पत्रान्वये सहायक संचालक, गट-ब या पदावर नियुक्तीसाठी ४४ उमेदवारांची शिफारस केली होती. सदरहू शिफारस झालेल्या ४४ उमेदवारांपैंकी सदरहू पदांसाठीची विहित अर्हतेच्या अनुषंगाने पात्र ठरलेल्या ३२ उमेदवारांना दि.२६.२.२०२४ रोजीच्या आदेशान्वये नियुक्तीने पदस्थापना देण्यात आली. तथापि, सदर नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांपैंकी काही उमेदवारांनी ते वैयक्तिक कारणास्तव इच्छिुक नसल्याचे / उप संचालक,गट-अ या उच्च पदावर निवड झाल्याने त्या पदावर रुजू झाले / विहित कालावधीत (मुदतवाढीसह) सदरहू पदस्थापनेच्या पदावर रूजू झाले नाहीत. सबब, अश्या उमेदवारांच्या नियुक्त्या शासन स्तरावर रद्द करून, त्यांचेऐवजी संबंधित प्रवर्गानुसार प्रतिक्षायादीतून आयोगास शासनाने केलेल्या विनंतीनुसार, आयोगाने उपरोक्त संदर्भीय क्र.१

येथील विविध पत्रांव्दारे **प्रतिक्षायादीतून** सहायक संचालक,गट-ब या पदावर नियुक्तीकरीता शासनास शिफारस केलेल्या एकूण ४ उमेदवारांना शासन सेवेत नियुक्तीने तात्पुरती पदस्थापना देण्याची बाब शासन स्तरावर विचाराधीन होती. यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन आदेश:-**

"सहायक संचालक, गट-ब" या संवर्गातील उमेदवारांना संदर्भाधीन क्र.२ येथील महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदावर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०२१ लागू आहेत. याबाबत उमेदवारांकडून प्राप्त विकल्पानुसार सदर अधिसूचनेन्वये अनुज्ञेय ठरणाऱ्या विभागीय महसुली विभागातंर्गत सहायक संचालक, गट-ब या पदावर तात्पुरती नियुक्तीने पदस्थापना देणे आवश्यक आहे.

२. शासनाच्या प्रचलित नियमानुसार सदर उमेदवारांची संबंधित **वैद्यकीय मंडळाकडून** तपासणी करण्यात आलेली आहे. तसेच, सामान्य प्रशासन विभागाने **चारित्र्य व पूर्वचारित्र्य** याची पडताळणी करण्याबाबत जारी केलेल्या शासन निर्णय दिनांक २८.०८.२०१७ नुसार उपरोक्त उमेदवारांचे चारित्र्य पडताळणी संबंधित पोलीस आयुक्त / पोलीस अधीक्षक कार्यालयांकडून करुन घेण्यात आलेली आहे.

३. तसेच, यापूर्वी सदरहू पदांकरीता आयोगाने शिफारस केलेल्या उमेदवारांच्या अनुभव प्रमाणपत्र व इतर कागदपत्रे पडताळणीकरिता शासनाने संदर्भ क्र.६ अन्वये, कामगार आयुक्त,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली होती. सदरहू शासन निर्णयातील विहित केलेल्या समितीच्या कार्यकक्षेच्या अनुषंगाने संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांनी उक्त संदर्भ क्र.७ येथील पत्राव्दारे शासनास अहवाल सादर केला आहे. त्याअनुसार शासनाने सहायक संचालक,गट-ब या पदावर प्रतिक्षायादीतून आयोगाव्दारे शिफारस झालेल्या खालील उमेदवारांची रकाना क्र.५ मधील अनुज्ञेय ठरणाऱ्या महसुली विभागांतर्गत संदर्भीय क्र.८ येथील इतिवृत्तान्वये, नागरी सेवा मंडळाच्या शिफारशीस अनुसरून खालील तक्त्यातील रकाना क्र.६ मध्ये दर्शविलेल्यानुसार पदस्थापनेच्या ठिकाणी "सहायक संचालक, गट-ब" या पदावर **सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन मॅट्रीक्समधील वेतन स्तर एस-१५ (रुपये ४१,८००-१३,२३००)** मध्ये ते ज्या दिवशी रुजू होतील, त्या दिनांकापासून त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या प्रवर्गामध्ये दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी तक्त्याखालील **अटी व शर्तींच्या** अधीन राहून तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे :-

| अ.क्र | प्रतिक्षायादीतून शिफारस झालेल्या उमेदवाराचे नांव | उमेदवाराची मूळ वर्गवारी | मलोआने शिफारस केलेला प्रवर्ग | नियमाप्रमाणे अनुज्ञेय/देय होणारा महसूली विभाग | पदस्थापनेचे ठिकाणी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री. आकाश जगन्नाथ तलवडकर | अ.जा. | अ.जा. (सर्वसाधारण) | छत्रपती संभाजीनगर | सह संचालक, छत्रपती सांभाजीनगर यांचे कार्यालय |
| २ | श्री.राजशेखर अयप्पा कडीवाल | भ.ज.क. | भ.ज.क | कोकण-२ | सह संचालक, रायगड यांचे कार्यालय |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३ | श्री.विनोद सुभाष मदुरकर | भ.ज.ब. | भ.ज.ब. | पुणे | सह संचालक, पुणे (कार्य.१) यांचे कार्यालय |
| ४ | श्री. अरविंद उल्हास राठोड | विजा.अ. | वि.जा.अ (महिला)ऐवजी | पुणे | सह संचालक, पुणे (कार्य.२) यांचे कार्यालय |

(१) सदरहू शासन आदेश सदर प्रकरणी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई खंडपीठ नागपूर येथे दाखल मूळ अर्ज क्र.९९५/२०२३, ९९६/२०२३ व १०२४/२०२३ मध्ये मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाच्या न्यायनिर्णयाच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

(२) सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय क्रमांक एसआरव्ही २०१८/व्ही.आय.पी.६७/ प्र.क्र.२०७/कार्या.१२,दिनांक २८.०५.२०१८ मधील तरतुदीनुसार उमेदवाराने सदर पदावर नियुक्ती आदेशापासून **तीस** दिवसांच्या आत सेवेत रुजू होणे आवश्यक आहे. सदर कालावधीत उमेदवार रुजू झाला नाही तर तो नोकरीची संधी गमावेल व त्याचा नियुक्तीकरिता विचार करण्यात येणार नाही. यासाठी उमेदवारांकडून देण्यात येणा-या कोणत्याही कारणांचा/ विनंतीचा विचार केला जाणार नाही.

(३) सदर उमेदवार आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या आत पदस्थापनेच्या जागी हजर न झाल्यास किंवा काही अपरिहार्य उचित कारणास्तव त्यांना मुदतवाढ हवी असल्यास, त्यांनी शासनाकडून मुदतवाढ घेणे आवश्यक असून तशी संमती न घेतल्यास किंवा शासनाकडून त्यांना मुदतवाढ न मिळाल्यास विहित मुदतीत रुजू न होणाऱ्या उमेदवारांचे नियुक्तीचे आदेश आपोआप रद्द होतील व त्यांचा नियुक्तीकरीता कोणत्याही परिस्थितीत विचार करण्यात येणार नाही. यासाठी उमेदवारांकडून देण्यात येणाऱ्या कोणत्याही कारणांचा/विनंतीचा विचार केला जाणार नाही. मुदतवाढीसंदर्भात सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०१८/ व्ही.आय.पी. ६७/प्र.क्र.२०७/कार्या.१२, दिनांक २८.०५.२०१८ व दिनांक २६.०९.२०१८ मधील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात येईल.

(४) **मागासवर्गीय उमेदवारांचे बाबतीत जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीचे आणि लागू असेल, तेथे उन्नत व प्रगत गटात मोडत नसल्याच्या प्रमाणपत्राची पडताळणी करण्याच्या अधीन राहून नियुक्ती देण्यात येत आहे.** मागासवर्गीय उमेदवारांचे प्रकरणी सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. बीसीसी २०११/प्र.क्र.१०६४/२०११/१६-ब, दिनांक १२.१२.२०११ मध्ये विहित मुदतीत जात पडताळणी समितीकडून जात वैधता प्रमाणपत्र प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी संबंधित उमेदवारांची राहील व विहित मुदतीत जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकल्यास, त्यांच्याबाबतीत तातडीने सेवा समाप्तीची कार्यवाही करण्यात येईल.

(५) संदर्भ क्र.३ येथील शासन अधिसूचनेअन्वये विनियमित केलेल्या महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली,२०२१ मधील तरतूदीनुसार सदरहू उमेदवारांची सहायक संचालक ,गट-ब या संवर्गातील ज्येष्ठता निश्चित करण्यात येईल.

(६) उपरोक्त उमेदवारांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.परिवी २७१५/ प्र.क्र.३०२/कार्या.८, दिनांक २२.०६.२०२१ नुसार नवीन परिवीक्षा धोरण लागू राहील. सदरहू सहायक संचालक, गट-ब यांना दोन वर्षाचा परिवीक्षाधीन कालावधी लागू राहील. सदर कालावधीत परिवीक्षा धोरणानुसार शासकीय कामकाज करण्यास सक्षम नसल्याचे सिद्ध झाल्यास संबंधित उमेदवाराची शासकीय सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल." तसेच सदर अधिसूचनेमध्ये नमूद केल्यानुसार परिवीक्षाधीन कालावधीत रजेच्या तरतूदी लागू होतील. तसेच, सदरहू शासन निर्णयतील तरतूदीनुसार, उपरोक्त उमेदवारांना परिविक्षा कालावधीमध्ये कोणतीही वेतनवाढ अनुज्ञेय असणार नाही.

(७) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक राआयो ४०१९/प्र.क्र.३१/१६-अ, दिनांक ३१.०५.२०२१ अन्वये खुल्या प्रवर्गातील आर्थिकदृष्टया दुर्बल घटकांसाठी (EWS) शासकीय सेवेमध्ये १०% जागा आरक्षित करण्यात आल्या आहेत. आवश्यकतेनुसार सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार आर्थिकदृष्टया दुर्बल घटकामध्ये मोडत असल्याचे (EWS) प्रमाणपत्रांची फेर पडताळणी संबंधित सक्षम प्राधिकरणाकडून करून घेण्याच्या अटीच्या अधिन राहून करण्यात येत आहे.

(८) या उमेदवारांना नियमाप्रमाणे मराठी/हिंदी भाषा परिक्षा विहित मुदतीत उत्तीर्ण व्हावी लागेल.

(९) सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान), शासन निर्णय प्रशिक्षण २०००/प्र.क्र.१६१/ २००१/३९, दिनांक १९.०३.२००३ कडील तरतुदीनुसार, संगणक हाताळणी/वापरांबाबतचे शासन मान्यता प्राप्त संस्थेचे प्रमाणपत्र, नियुक्ती दिनांकापासून दोन वर्षाच्या कालावधीत सादर करणे आवश्यक आहे. तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन पुरकपत्र क्रमांक : मातंसं २०१२/ प्र.क्र.२७७/ ३९, दिनांक ०८.०१.२०१८ मधील परिच्छेद क्रमांक १.६ मधील तरतूदीनुसार संगणक अर्हता परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट अनुज्ञेय राहील.

(१०) उपरोक्त उमेदवारांना वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : अंनियो १००५/ १२६/सेवा-४, दिनांक ३१.१०.२००५ मधील तरतूदीनुसार उक्त उमेदवारांना नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना लागू ठरेल.

(११) उपरोक्त उमेदवारांना शासन सेवेत रुजू झाल्यानंतर सेवेचा राजीनामा द्यावयाचा असल्यास, त्यांना सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : एसआरव्ही १०९२/ १०३३/प्र.क्र.३३/ ९२/ ८, दिनांक ०२.१२.१९९७ मधील तरतूदीनुसार शासनाला किमान १ (एक) महिन्याची आगाऊ लेखी सूचना किंवा एक महिन्याचे वेतन देणे आवश्यक राहील. यासंदर्भातील राजीनामा स्विकारण्याचे अधिकार केवळ नियुक्ती प्राधिकारी (शासन) यांना असतील. क्षेत्रिय कार्यालयांनी उमेदवारांचा परस्पर राजीनामा स्विकृत करु नये किंवा मंजूर करु नये.मात्र, गैरवर्तणूक, सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी सूचना देण्याचे बंधन शासनावर राहणार नाही.

(१२) उपरोक्त उमेदवारांपैकी पूर्वी शासकीय सेवेत असणाऱ्या उमेदवारांची सरळसेवेने शासनाच्या दुसऱ्या पदावर परिवीक्षाधीन उमेदवार म्हणून नियुक्ती झाली असल्यास अशा उमेदवारांची “सहायक

संचालक, गट-ब” या पदावरील वेतननिश्चिती ही शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : वेतन १२८९/प्र.क्र.२/९०/सेवा-३, दिनांक २३.०३.१९९४ मधील तरतूदीनुसार करण्यात यावी. तर, उपरोक्त उमेदवारांपैकी पूर्वी शासकीय सेवेत नसणाऱ्या उमेदवारांची सरळसेवेने शासनाच्या परिवीक्षाधीन उमेदवार म्हणून नियुक्ती झाली असल्यास अशा उमेदवारांची “सहायक संचालक, गट-ब” या पदावरील वेतननिश्चिती ही महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील तरतूदीनुसार करण्यात यावी.

(१३) उपरोक्त उमेदवार सध्या केंद्र/राज्य शासनाच्या सेवेत अथवा निमशासकीय सेवेत कार्यरत असतील, तर संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी त्यांना नेमणूकीच्या ठिकाणी हजर होण्याच्या दृष्टीने सदर सेवेतून कार्यमुक्त झाल्याचे अथवा तसे लेखी पत्र सादर केल्याशिवाय त्यांना रुजू करुन घेता येणार नाही.

(१४) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक वशिअ १२१४/प्र.क्र.२६/११, दिनांक ०२.०६.२०१४ नुसार उमेदवाराने नियुक्तीच्या दिनांकापासून दोन महिन्यांच्या कालावधीत त्यांची स्वत:ची मत्ता व दायित्वे याबद्दलची विवरणपत्रे शासन निर्णयासोबतच्या प्रपत्र एक, दोन व तीन या तीन प्रपत्रांमध्ये नियुक्ती प्राधिकाऱ्यांकडे सादर करावीत.

(१५) उपरोक्त उमेदवारांची तात्पुरती नियुक्ती सामान्य प्रशासन विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०२२/प्र.क्र.१६७/१६-अ, दि.२१.११.२०२२ मधील तरतूदीनुसार EWS आरक्षण प्रकरणी मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मा.उच्च न्यायालय येथे प्रलंबित याचिका तसेच मा. सर्वोच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या विशेष अनुमती याचिका (डायरी) क्र.२९१७४/२०२२ मधील अंतिम निकालाच्या अधिन राहिल.

४. सदर सहायक संचालक, गट-ब या पदांवर हजर होणाऱ्या उमेदवारांनी आपला रुजू अहवाल संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांचेमार्फत शासनास सादर करावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक **२०२५०३०३१६१३३०५३१०** असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

DEEPAK UTTAMRAO POKALE

Digitally signed by DEEPAK UTTAMRAO POKALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=856b31c793b12e4f22cb247c5cff7f3358867f2482aa2234f6131bf8940dbd2e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F4163205E7B4960CC7CA6F973D6DEB06502B2E8FC47A411BABCF42A0E99CF34B, cn=DEEPAK UTTAMRAO POKALE
Date: 2025.03.03 16:14:20 +05'30'

**(दिपक पोकळे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.श्री.तलवडकर आकाश जगन्नाथ
२. श्री.राजशेखर अय्यप्पा कडीवाल

३. श्री.मदुरकर विनोद सुभाष

४.श्री.राठोड अरविंद उल्हास

या सर्व “सहायक संचालक,गट-ब” ह्या शिफारसपात्र उमेदवारांना **ई-मेल** संदेशाद्वारे व **संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय**,मुंबई यांचेमार्फत

**प्रत :-**

१. मा.यांचे खाजगी सचिव (कामगार) मंत्री .
२. मा.यांचे खाजगी सचिव (कामगार) राज्यमंत्री.
३. मायांचे स्वीय सहायक (कामगार) प्रधान सचिव .
४. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई
५. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राने)
६. महालेखापाल२/१-,लेखा परिक्षालेखा व अनुज्ञेयता/, महाराष्ट्र राज्य, मुंबई.नागपूर/
७. सर्व संबंधित संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य.
८. उप सचिव(१-काम) अवर सचिव /, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग
९. निवड नस्ती (१-काम)